राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत विणकरांना हातमागाचा पुरवठा करण्यास मान्यता प्रदान करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृयो १०१५ /प्र.क्र.६० /रेशीम कक्ष ,**

मंत्रालय , मुंबई- ४०००३२

तारीख: ५ ऑक्टोबर, २०१५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पदूम विभाग यांचे २० व्या राज्यसतरीय प्रकल्प मंजूरी समिती क्रं.राकृवि-०४१५/प्र.क्र.३८ /राकृवियो कक्ष, दि.२५ जून, २०१५

२) संचालक (रेशीम), नागपूर यांचे पत्र क्र.रे/कार्या-८/आर.के.व्ही.वाय/१५-१६/८०० दि.२७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्रामध्ये हातमागावर तुती रेशीम/ साडी निर्मितीचे कामकाज प्रामुख्याने येवला, पैठण कामठी जि.नागपूर तसेच टसर रेशीमकरीता मोहाडी, आंधळगाव जि.भंडारा येथे पारंपारीकरित्या सुरू आहे. हा पारंपारीक व्यवसायला राज्यात बळकटी देण्यासाठी तसेच विणकराना नवीन तंत्रज्ञानाचा फायदा व्हावा व त्यातून त्यांना आर्थिक स्थैर्य मिळावे म्हणून रा.कृ.वि.योजनेअंतर्गत हातमाग पुरवठा करण्याचा प्रस्ताव संचालक (रेशीम) यांनी संदर्भ क्रं.२ अन्वये सादर केला आहे. या प्रस्तावानुसार राज्यातील १०० विणकराना हातमाग पुरवठा करण्याचे नियोजन आहे. सदर प्रस्तावास राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीच्या दि.२५ जून, २०१५ च्या इतिवृत्तानुसार मान्यता देण्यात आलेली आहे. या मान्यतेच्या अनुषंगाने सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याची तसेच हातमाग पुरवठा करण्याच्या मार्गदर्शक सुचना,अटी व शर्ती निर्धारीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील १०० विणकरांना हातमाग पुरवठा करण्याच्या रु.४०,०००/- प्रति हातमाग याप्रमाणे रु.४० लक्ष व प्रकल्पाच्या प्रशासकीय व सल्लागार खर्चाकरीता रु. १.८० लक्ष असे एकूण रु.४१.८० लक्ष इतक्या रकमेच्या योजनेस राष्ट्रीय कृषि विकास योजनातंर्गत सन २०१५-१६ मध्ये राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. या योजनेच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील.

**१) लाभार्थी निवडीचे निकष** :-

अ) लाभार्थ्याने विहीत नमुन्यात अर्ज करावा.

ब) पारंपारिक हातमाग समुहातील विणकर या योजनेचे लाभार्थी राहतील.

क) केंद्रीय रेशीम मंडळ अथवा विणकर सेवा केंद्र यांच्याद्वारे प्रशिक्षित विणकर असल्यास त्यांचाही यामध्ये समावेश करण्यात यावा.

ड) स्वत:ची अथवा ३ ते ५ वर्षासाठी भाडयाने घेतलेली जागा उपलब्ध असणे आवश्यक.

**२) योजनेची कार्यपध्दती** :-

अ) लाभार्थ्यांचे अर्ज प्राप्त झाल्यानंतर संबधित जिल्हयाचे रेशीम विकास अधिकारी व सहायक संचालक यांनी संयुक्त दौरा करून लाभार्थ्यांच्या निवडीबाबत व्यवहार्यता ( Feasiblity) अहवाल संचालनालयास सादर करावा.

ब) लाभार्थ्यांची निवड झाल्यानंतर त्यांना तात्काळ मंजूरीपत्र देण्यात यावे.

क) मंजूरीपत्रामध्ये हातमागाचे विनिर्दीष्टाचा (specification) उल्लेख करण्यात यावा तसेच स्थानिकरित्या हातमाग पुरवठा धारकाची यादी माहितीसाठी लाभार्थ्यांना देण्यात यावी.

ड) लाभार्थ्यांने मंजूरीपत्रात नमूद असलेल्या पुरवठाधारकाकडून अथवा इतर स्त्रोतातून हातमागाची मागणी नोंदवावी.

इ ) मंजूर केलेल्या लाभार्थ्यांना हातमाग व खेळते भांडवलाकरीता बँकेमार्फत वित्तीय सहाय्याकरीता संचालनालयामार्फत प्रयत्न करण्यात यावे.

ई) हातमाग पुरवठाधारकाने केंद्रीय रेशीम मंडळाच्या मानकाप्रमाणे अथवा स्थानिक पारंपारिक वाण / इतर वाणाचे गरजेनुसार सुधारणा केलेले हातमाग लाभार्थीना पुरवठा करून उभारणी करावी.

उ) हातमागाची उभारणी झाल्यानंतर रेशीम विकास अधिकारी, सहायक संचालक व उपसंचालक यांनी संयुक्त पहाणी करून संचालनालयास अहवाल सादर करावा.

ऊ) या योजनेतंर्गत निवड केलेल्या लाभार्थ्यांना हातमाग घेण्यासाठी अनुदानाच्या मर्यादेत बँकेने कर्ज मंजूर केल्यानंतर लाभार्थ्यांना देय असलेल्या अनुदानाची रक्कम बँकेकडे जमा करावी किंवा लाभार्थ्याने स्व:त हातमागाची खरेदी करून उभारणी केली असल्यास अनुदानाची रक्कम संबधीत लाभार्थ्याच्या थेट बँक खात्यात जमा करण्याची कार्यवाही संचालक (रेशीम) यांनी संबधित सहायक संचालक यांचेमार्फत करावी.

**३) अन्य अटी** :-

अ) प्रस्तुत कार्यक्रम संचालनालयाने निश्चित केलेल्या कार्यक्षेत्रात तसेच विहीत कालावधीत पुर्ण करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

ब) सदर कार्यक्रम राबविणेसाठी राष्ट्रीय कृषि योजनेतर्गत मंजूर निधीतून व अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

क) या योजनेतंर्गत खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्र कृषि विभागास विहीत मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

३. हा शासन निर्णय कृषि व पदूम विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००५१५०२०६४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2015.10.05 15:05:51 +05'30'

**( वि.रा.ठाकूर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव( कृषि) मंत्रालय, मुंबई -३२
२. उपसचिव (कृषि) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषि व पदूम, मंत्रालय, मुंबई -.३२.
३. संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , (लेखा व अनुज्ञेयता) लेखा परिक्षा , मुंबई /नागपूर.
५. आयुक्त (कृषि) कृषि आयुक्तालय, म.राज्य , पुणे
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य छोटया शेतक-यांचा व्यापारी संघ , पुणे
७. संचालक, कृषि प्रक्रीया व नियोजन , कृषि आयुक्तालय, म.राज्य पुणे
८. सहाय्यक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यलय नागपूर/ अमरावती/औंरगाबाद/ पुणे.
९. सर्व रेशीम विकास अधिकारी
१०.रेशीम निवड नस्ती.